महाराष्ट्र राज्य कृषी पणन मंडळावरील अशासकीय सदस्यांच्या नियुक्त्या रद्द करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कृपमं- ०३२०/प्र.क्र.६४/२१-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: १९ मार्च, २०२०

वाचा :-

१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. -संकिर्ण०६१४/प्र.क्र.१०१/२१-स दि.०२.०८.२०१४.
२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. -बासप्र०४१७/प्र.क्र.७४/२१-स दि.०६.०६.२०१६.
३) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. -बासप्र०४१७/प्र.क्र.७४/२१-स दि.०९.०८.२०१७.
४) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. -बासप्र०४१७/प्र.क्र.७४/२१-स दि.१८.०१.२०१८.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र कृषि उत्पन्न पणन (विकास व विनियमन) अधिनियम, १९६३ मधील कलम ३९(ख)(सात) अन्वये महसूल विभागातून प्रत्येकी एक या प्रमाणे संबंधीत महसूल विभागातून बाजार समित्यांच्या सभापतीमधून राज्य शासनाने दि. ६ जून, २०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये अमरावती, नाशिक, पुणे व कोंकण या चार महसूली विभागांसाठी अशासकीय सदस्यांच्या नियुक्त्या केल्या आहेत. तसेच नागपूर महसूल विभागातून दि. १८.०१.२०१८ रोजीच्या शासन निर्णयानुसार अशासकीय सदस्यांची नियुक्ती करण्यात आली आहे. महाराष्ट्र कृषी उत्पन्न पणन (विकास व विनियमन) अधिनियम, १९६३ मधील कलम ३९-ड तरतूदी नुसार सदर सदस्यांची नियुक्ती रद्द करण्याचा अधिकार राज्य शासनास आहेत. या अधिकारानुसार महाराष्ट्र राज्य कृषी पणन मंडळावर सद्यस्थितीत नियुक्त असलेल्या अमरावती, नाशिक, पुणे, कोकण व नागूपर महसूली विभागातील अशासकीय सदस्यांच्या नियुक्त्या महाराष्ट्र कृषी उत्पन्न पणन (विकास व विनियमन) अधिनियम, १९६३ मधील कलम ३९ (ड) च्या तरतूदीनुसार रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र कृषी उत्पन्न पणन (विकास व विनियमन) अधिनियम, १९६३ मधील कलम ३९ (ड) अन्वये शासनास प्राप्त अधिकारानुसार, महाराष्ट्र राज्य कृषी पणन मंडळावर सद्यस्थितीत नियुक्त असलेल्या अमरावती, नाशिक, पुणे, कोकण व नागूपर महसूली विभागातील पुढीलप्रमाणे अशासकीय सदस्यांच्या नियुक्त्या याद्वारे रद्द करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | महसुल विभाग | नाव | कृषी उत्पन्न बाजार समिती |
|---|---|---|---|
| १ | अमरावती | श्री.मोहन उत्तमराव इंगळे | सभापती, कृ.उ.बा.स.धामणगाव, जि. अमरावती |
| २ | नाशिक | श्री.नारायण बाजीराव पाटील | सभापती, कृ.उ.बा.स.दौंडाईचा, जि. धुळे |
| ३ | पुणे | श्री.भाऊसाहेब भगवान गायकवाड | सभापती, कृ.उ.बा.स.आटपाडी, जि. सांगली |
| ४ | कोकण | श्री रविंद्र नारायण घोंडविंदे | सभापती, कृ.उ.बा.स.कल्याण, जि. ठाणे |
| ५ | नागपूर | श्री. रुपचंद रामकृष्णजी कडू | सभापती, कृ.उ.बा.स.उमरेड, जि. नागपूर |

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००३१९१४४७१५७३०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KALU GONYA VALVI

Digitally signed by KALU GONYA VALVI
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=714701fc3db9c38a46f4cd82e1e450b51a9e92eede8c323934f82edb538d3b20, postalCode=400032, street=MANTRALAYA , MUMBAI , serialNumber=8c5d0f275c3d9a21db07fecf7919c2d83796e88930d62d44e7a4a6d4cbee7e0e, ou=CO OPERATION MARKETING AND TEXTILE DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=KALU GONYA VALVI
Date: 2020.03.19 14:49:28 +05'30'

**( का. गो. वळवी )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री (सहकार व पणन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा.राज्यमंत्री (पणन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा.प्रधान सचिव (पणन विभाग) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय मुंबई
४) पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे
५) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे
६) उपसचिव( पणन) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
७) श्री.मोहन उत्तमराव इंगळे, सभापती, कृ.उ.बा.स.धामणगाव, जि. अमरावती
८) श्री.नारायण बाजीराव पाटील, सभापती, कृ.उ.बा.स.दौंडाईचा, जि. धुळे
९) श्री.भाऊसाहेब भगवान गायकवाड, सभापती, कृ.उ.बा.स.आटपाडी, जि. सांगली
१०) श्री रविंद्र नारायण घोंडविंदे, सभापती, कृ.उ.बा.स.कल्याण, जि. ठाणे
११) श्री. रुपचंद रामकृष्णजी कडू, सभापती, कृषी उत्पन्न बाजार समिती, उमरेड, जि. नागपूर
१२) निवडनस्ती (२१-स).